GR - 2004080516004 0002-1201

अनिवासी भारतीय आणि विदेशातील भारतीय वंशाच्या व्यक्तींकडून किंवा त्यांनी स्थापन केलेल्या संघटनेकडून निधी स्विकारण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
शासन परिपत्रक क्रमांक - २००२/प्र.क्र.४२५८/विस-३
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
मंत्रालय,मुंबई-४०००३२,
दिनांक -२० मे ,२००३

**परिपत्रक**

केंद्र शासनाने त्यांच्या क्रमांक एफ-संख्या -३/१६/२०००/ ईईसी-व्हीआय,भारत सरकार ,वित्त मंत्रालय, आर्थिक कार्य विभाग,नई दिल्ली,दिनांक १ ऑक्टोबर,२००२ च्या पत्रान्वये ग्रामीण विकासाच्या योजना राबविण्यासाठी अनिवासी भारतीय आणि विदेशातील भारतीय वंशाच्या व्यक्ती किंवा त्यांनी स्थापन केलेल्या संघटनांकडून निधी स्वीकारण्याचे अधिकार पंचायत राज संस्थांना दिलेले आहेत.

महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१ मधील कलम १३०(२)(ञ) खालील तरतुदीनुसार अनिवासी भारतीय आणि विदेशातील भारतीय व्यक्ती किंवा त्यांनी स्थापन केलेल्या संघटनांकडून प्राप्त होणारा निधी जिल्हा परिषदा व पंचायत समित्यांना स्वीकारता येईल,प्राप्त झालेल्या रकमा जिल्हा निधीत जमा करण्यांत येतील. या प्राप्त झालेल्या रकमा जिल्हा परिषदेच्या स्व:उत्पन्नाचा भाग असल्याने उक्त अधिनियमाच्या कलम १५५(३)मध्ये नमूद केल्यानुसार अनुसूची -१ व अनुसूची -२ मध्ये नमूद केलेल्या बाबींवर (स्थानिक विकास योजनांवर ) खर्च करता येईल.

केंद्र शासनाच्या दिनांक १ ऑक्टोबर २००२ च्या पत्रास अनुसरुन खालीलप्रमाणे कार्यवाही करण्याच्या सूचना सर्व जिल्हा परिषदांना देण्यांत येत आहेत.

(१) अशा प्राप्त झालेल्या निधीकरीता जिल्हा परिषदांनी स्वतंत्र बँक खाते उघडावे व त्याच्या खर्चासाठी स्वतंत्र नोंदवही ठेवावी.

(२) सदरच्या निधीतून झालेल्या खर्चाचा मासिक अहवाल केंद्र शासनाला सादर करावयाचा असल्यामुळे सर्व जिल्हा परिषदांनी संबंधित जिल्हाधिका-यांमार्फत सोबत जोडलेल्या विवरणपत्रात मासिक खर्चाचा अहवाल राज्य शासनाकडे पाठवावा.

(३)जिल्हा परिषदांनी अशा प्राप्त झालेल्या निधीच्या जमा व खर्चाचा समावेश त्यांच्या स्वउत्पन्नांच्या अर्थसंकल्पात स्वतंत्रपणे दर्शविण्यात यावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(उषा महाडीक)

कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन

प्रति,

श्री.नविन कुमार

मा.८१६ सचिव (ईईसी)

भारत सरकार वित्त मंत्रालय,

आर्थिक कार्य विभाग,

नवी दिल्ली

प्रत माहिती व योग्य त्या कार्यवाहीसाठी सादर -

२) सर्व जिल्हाधिकारी,

३)सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,

४)सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,

५)सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष,

६)महालेखापाल-१ महाराष्ट्र राज्य,मुंबई(लेखा व परिक्षण)

७)महालेखापाल-२महाराष्ट्र राज्य,नागपूर (लेखा व परिक्षण)

८) महालेखापाल-१ महाराष्ट्र राज्य,मुंबई (लेखा व अनुज्ञेयता)

९) महालेखापाल-२ महाराष्ट्र राज्य,नागपूर (लेखा व अनुज्ञेयता),

१०) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,

११)उपसंचालक लेखा व कोषागारे,कोकण भवन,नवी मुंबई बेलापूर /नाशिक/ पुणे/ औरंगाबाद/अमरावती/नागपूर

१२)महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई,

१३)वित्त विभाग (व्यय-१५)(बीयुडी-१६)व अर्थोपाय कार्यासन,मंत्रालय,मुंबई-

१४)मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा,कोकणभवन,बेलापूर/नाशिक/पुणे/ औरंगाबाद/ अमरावती /नागपूर

१५)उप मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा,कोकण भवन,बेलापूर/ नाशिक/ पुणे/ औरंगाबाद/अमरावती/नागपूर.

१६) कार्यासन क्रमांक-वित्त-१,वित्त-७ व वित्त-८,ग्राम विकास व जलसंधारण विभाग,

१७)निवड नस्ती ,कार्यासन क्रमांक-वित्त-३,ग्राम विकास व जलसंधारण विभाग,

१८)समन्वय कक्ष,ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई.

<u>विवरणपत्र क</u>

अनिवासी भारतीय / भारतीय वंशाच्या व्यक्तीकडून प्राप्त होणा-या देणगी संबंधी माहिती.

महिना -
पंचायत राज संस्थेचे नांव -
पत्ता -

| देणगी देणा-याचे नांव | देणगी देणा-याचा पत्ता | देणगीची रक्कम | देणगी देण्याचे कारण | बँक खाते क्रमांक | देणगी दिल्याची तारीख |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| | | | | | |

सही

अधिका-याचे नांव

पदनाम

टिप - जर एखादया महिन्यात देणगी प्राप्त झाली नाही तर अहवाल पाठविण्याची आवश्यकता नाही.